कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील मान्यताप्राप्त विना अनुदानित कला संस्थेमध्ये केलेली सेवा वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी ग्राह्य धरण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.एडीआर -२०१८/प्र.क्र.११०/१८(भाग २)/तांशि-६**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: १९ एप्रिल,२०२२

**संदर्भ** :- शालेय शिक्षण व क्रीडा विभाग शासन निर्णय क्रमांक एसएसएन १०९९/(३०८/९९)/ माशि-२ दिनांक २८ नोव्हेंबर,२००६

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण विभागाच्या नियंत्रणाखालील अशासकीय अनुदानित शाळांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना विविध २३ शासन निर्णयांन्वये मिळणारे लाभ अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांनादेखील मिळावे, यासाठी मुंबई उच्च न्यायालय येथे याचिका क्र. २८१७/२०१४ व उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे याचिका क्र.३८७२/२००५ दाखल करण्यात आल्या होत्या. याचिकाकर्त्यांच्या मागण्या मान्य करून मा. न्यायालयांनी दि. ५.१०.२०१७ आणि दि. २६.०२.२०१८ च्या आदेशांन्वये सदर याचिका निकाली काढल्या आहेत. उपरोक्त लाभांमध्ये अशासकीय विनाअनुदानित कला संस्थेमध्ये केलेली सेवा वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी ग्राह्य धरावी या मागणीचा समावेश आहे. मा. न्यायालयाच्या आदेशांचे अनुपालन करण्याच्या अनुषंगाने अशासकीय अनुदानित कला संस्थेमध्ये केलेली सेवा वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी ग्राह्य धरण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत दिनांक ३१ मार्च,२०२२ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीमध्ये चर्चा झाली असून पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे:-

**शासन निर्णय :-**

कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील मान्यता प्राप्त विनाअनुदानित कला संस्थेमध्ये केलेली सेवा खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून, वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी ग्राह्य धरण्यात यावी.

१. संबंधित कला संस्थेस शासनाकडून वा सक्षम प्राधिकाऱ्याकडून विनाअनुदानित तत्वावर परवानगी किंवा मान्यता मिळालेली असली पाहिजे.
२. संबंधित शिक्षकाने त्या पदासाठी विहीत केलेली शैक्षणिक अर्हता ज्या दिनांकाला धारण केली असेल, त्या दिनांकापासूनची त्याची सेवा वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी विचारात घेण्यात यावी. मात्र, अशा पदास व नियुक्तीस सक्षम प्राधिकाऱ्याने मान्यता दिलेली असणे आवश्यक आहे. ही मान्यता ज्या दिनांकापासून देण्यात आली असेल, त्या दिनांकापासूनची सलग सेवा विचारात घेण्यात यावी.
३. संबंधित शिक्षकाची नियुक्ती आरक्षणाच्या धोरणास अनुसरुन त्या त्या संवर्गात केलेली असणे आवश्यक आहे.

४. एखाद्या मागासवर्गीय उमेदवाराच्या नियुक्तीस एखाद्या विशिष्ठ संवर्गाचा उमेदवार प्रयत्न करुनही मिळाला नाही, अशा प्रकरणी सामान्य प्रशासन विभागाचा शासन निर्णय क्रमांक बीसीसी-१०९४/सीआर-५७/९४/१६-ब दिनांक ५ डिसेंबर,१९९४ मधील तरतुदीनुसार कार्यवाही करावी. सदर कार्यवाहीचा अवलंब करून आरक्षण वगळण्यास सक्षम प्राधिकाऱ्याची मान्यता प्राप्त झाली असेल तरच, अशा पदावर विहित कार्यपध्दतीचा अवलंब करून तात्पुरत्या स्वरूपात नियुक्त करण्यात आलेल्या शिक्षकाच्या बाबतीत त्यांच्या प्रथम नियुक्तीपासून म्हणजे यथास्थिती मागील ६ अथवा ७ वर्षांची सलग सेवा वरिष्ठ वा निवडश्रेणीसाठी विचारात घेण्यात यावी. मात्र ही सर्व सेवा सलग आणि एकाच विनाअनुदानित कला संस्थेमधील असणे आवश्यक आहे.

५. एखाद्या विशिष्ट संवर्गाचा विहीत शैक्षणिक व प्रशिक्षित मागासवर्गीय उमेदवार प्रयत्न करुनही उपलब्ध होत नसेल तर त्याच संवर्गाच्या अप्रशिक्षित उमेदवाराची शिक्षक म्हणून नियुक्ती करण्याची सवलत काही अटींवर देण्यात आलेली आहे. अशा शिक्षकांनी विहित शैक्षणिक अर्हता धारण केलेल्या दिनांकापासूनची सलग सेवा वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी विचारात घ्यावी.

६. कोणत्याही कारणास्तव शिक्षकाच्या सेवेत खंड पडल्यास वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी धरावयाचा अर्हताकारी सेवा कालावधीत, हा सेवाखंड विचारात घेण्यात येवू नये म्हणजेच, प्रत्यक्ष अध्यापनाचे काम केलेलाच कालावधी विचारात घेण्यात यावा.

७. सेवेत खंड न पडता एका पेक्षा जास्त विनाअनुदान कला संस्थेमधील सेवाकाळ वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी ग्राह्य धरावा.

८. कायम विनाअनुदानित तत्वावरील कला संस्थेमध्ये केलेली सेवा वरिष्ठ व निवडश्रेणीसाठी ग्राह्य धरण्यात येणार नाही.

९. कायम विनाअनुदानित तत्वावरील कला संस्थेमधील विहित शैक्षणिक अर्हता प्राप्त शिक्षकांनी त्याच संस्थेच्या अन्य विनाअनुदानित तत्वावरील कला संस्थेमध्ये वा अन्य विनाअनुदानित तत्वावरील कला संस्थेमध्ये नियुक्ती स्वीकारली, तर ती नवीन नियुक्ती ठरेल. या नियुक्तीस सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेल्या मान्यतेच्या दिनांकापासूनची सेवा यासाठी विचारात घेण्यात यावी.

१०.आर्थिक तरतूद खेरीज करुन अन्य कारणास्तव की, ज्यास संबंधित कला संस्था किंवा व्यवस्थापन जबाबदार आहे, अशा त्रूटी सक्षम प्राधिकाऱ्याने त्या कला संस्थेच्या निरीक्षणाचे वेळी संबंधितांच्या निदर्शनास आणून दिल्यास आणि त्यामुळे त्यास अनुदानास अपात्र ठरविल्यास, अशा संस्थेतील शिक्षकांच्या अर्हताकारी सेवेच्या कालावधीची गणना करताना, अशा त्रूटी दर्शविल्याच्या वा कळविल्याच्या दिनांकापासून ते अशा त्रूटी प्रत्यक्षात दूर केल्याच्या दिनांकापर्यंतचा कालावधी विचारात घेवू नये. त्रूटी दूर करण्यात आल्याची सक्षम प्राधिकाऱ्याकडून खातरजमा करुन असे प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे.

११. पात्र कर्मचाऱ्यांची कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील मान्यताप्राप्त विनाअनुदानित कला संस्थेमध्ये केलेली सेवा ग्राह्य धरुन त्यांना वरिष्ठ अथवा निवडश्रेणी मंजूर करण्यात

आल्यानंतर त्यांची त्या वेतनश्रेणीत काल्पनिक वेतननिश्चिती करण्यात यावी आणि सदर वेतननिश्चितीच्या परिणामी अनुज्ञेय वेतन व भत्त्यांचे प्रत्यक्ष लाभ हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून देण्यात यावे. तत्पुर्वीची थकबाकी अनुज्ञेय ठरणार नाही.

१२. जे कर्मचारी दिनांक १ जानेवारी, १९८६ ते या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंतच्या कालावधीत सेवानिवृत्त झाले असतील अशा पात्र कर्मचाऱ्यांची कला संचालनालयाच्या नियंत्रणाखालील मान्यताप्राप्त विनाअनुदानित कला संस्थेमध्ये केलेली सेवा ग्राह्य धरून त्यांना वरिष्ठ अथवा निवडश्रेणी मंजूर करण्यात आल्यानंतर त्यांची त्या वेतनश्रेणीत काल्पनिक वेतननिश्चिती करण्यात यावी आणि त्यानुसार निवृत्तीवेतन सुधारित करण्यात यावे. सदर सुधारित निवृत्तीवेतनाचे प्रत्यक्ष लाभ हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून देण्यात यावेत. तत्पुर्वीची थकबाकी अनुज्ञेय ठरणार नाही. तसेच, निवृत्तीवेतन सुधारित करण्यात आले तरी त्या अनुषंगाने सेवानिवृत्तीवेतनविषयक इतर लाभ सुधारित करण्यात येऊ नयेत.

१३.या प्रयोजनार्थ येणारा वाढीव खर्च संबंधित आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीतून करण्यात यावा.

सदर लाभ मा.न्यायालयांनी दिलेल्या आदेशांची अंमलबजावणी करण्यासाठी अनुज्ञेय करण्यात येत आहे. त्यामुळे सदर निर्णय केवळ अशासकीय अनुदानित कला संस्थांमधील शिक्षक / शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना लागू राहतील.

सदरचा शासन निर्णय दिनांक ३१ मार्च,२०२२ रोजी राज्य मंत्रिमंडळाच्या बैठकीत झालेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक ३५६/२०१९/सेवा-९ दिनांक ९ सप्टेंबर,२०१९ आणि ४४/२०२२/व्यय-५ दिनांक १२ जानेवारी,२०२२ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०२२०४१९१२३८२१४८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Rajaram Utekar

Digitally signed by Sandesh Rajaram Utekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher & Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=009789e9fe23fde06096381e43bebecd32b5c692c899745eee7d89d805005a87, cn=Sandesh Rajaram Utekar
Date: 2022.04.19 12:40:41 +05'30'

**( सं. रा. उतेकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा, विधानभवन मुंबई.

४. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, विधानभवन मुंबई.

५. मा.राज्य मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल, महाराष्ट्र ( लेखा व अनुज्ञेयता ) , महाराष्ट्र १ / २, मुंबई/नागपूर.
७. महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र १ / २, मुंबई / नागपूर.
८. मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
९. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१०. सर्व सह / उप सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. कला संचालक, कला संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१२. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१४. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर / औरंगाबाद,
१५. निरीक्षक, चित्रकला व शिल्प, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. वित्त विभाग (सेवा-९) व (व्यय-५) मंत्रालय, मुंबई,
१७. निवड नस्ती, उच्च व तंत्र शिक्षण विभाग (तांशि-६).